**शालेय शिक्षण विभागांतर्गत कार्यालयांत ५० ठिकाणी व्हिडीओ कॉन्फरन्स सेवा उपलब्ध करुन देण्याच्या खर्चास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईगव्ह-१५२१/प्र.क्र.१२/संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- ०२ ऑगस्ट, २०२३

**वाचा :-**

१) प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.९ जून, २०२१ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.ईगव्ह-१५२१/प्र.क्र.१२/संगणक, दि.१३ ऑगस्ट, २०२१.
३) प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.१६.१२.२०२२ रोजीच्या बैठकीचे इतिवृत.
४) संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांचे पत्र क्र.राशैसंप्रपम/आय.टी./VC/२०२२-२३/१०९१, दि.२४ फेब्रुवारी, २०२३.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे मध्ये ५० mbps क्षमतेची Dedicated Leased Line व १ mbps क्षमतेची (४७ ठिकाणांवरील ) Dedicated Leased Line करण्यात आली आहे. प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत शालेय शिक्षण विभागांतर्गत कार्यालयांत ५० व्हिडीओ कॉन्फरन्स केंद्रांच्या ठिकाणी नवीन हार्डवेअर व इंटरनेट सुविधेस मुदतवाढ देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने संदर्भ क्र.४ अन्वये संचालक, शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे यांनी सेवा पुरवठादाराचे रु.३६,५८,२८५/- एवढया रकमेचे देयक अदा करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार निधी वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

२. दिनांक १३ ऑगस्ट, २०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार व्हिडीओ कॉन्फरन्स सुविधेसाठी खालील तक्त्यात नमूद तपशिलाप्रमाणे रु.३६,५८,२८५/-( छत्तीस लाख अठ्ठावन्न हजार दोनशे पंच्याऐंशी ) इतक्या खर्चास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशील | निधी | शेरा |
|---|---|---|---|
| १ | ५० mbps Internet Leased Line | १,८९,०९०/- | दि. २२ जुलै, २०२२ते जानेवारी २०२३, अखेरपर्यंतचे देयक प्रलंबित आहे. |
| २ | १ mbps Dedicated Internet Leased Line | ५,६८,३८९/- | |
| ३ | Operation, Maintenance & Training | २९,००,८०६/- | |
| **एकूण** | | **३६,५८,२८५** | |

३. सदरचा खर्च मागणी क्रमांक. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण,८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ( २२०२ H ४५४ ) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०२२-२३ च्या उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे यांना नियंत्रक अधिकारी आणि लेखाधिकारी, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग- २ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५४९ /व्यय-५, दिनांक ०२.०६.२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०२१७३५०७२९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2023.08.03 10:36:49 +05'30'

**( विवेक सपकाळ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) अ.मु.स., वित्त विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

२) अ.मु.स., माहिती व तंत्रज्ञान विभाग,यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

३) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्विय सहायक मंत्रालय, मुंबई.

४) आयुक्त(शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे

५) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे.

६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.,

७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.

८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

९) निवडनस्ती/ संगणक.